कोव्हीड-१९ या आजारामुळे मृत पावलेल्या व्यक्तीच्या नजिकच्या नातेवाईकास सानुग्रह सहाय्य मंजूर करण्यासाठी खर्च करावयाची कार्यपध्दती....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन परिपत्रक :- सीएलएस-२०२१/प्र.क्र.२५४/म-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०९ डिसेंबर, २०२१

वाचा :- शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.सीएलएस-२०२१/प्र.क्र२५४/म-३, दि.२६.११.२०२१

**प्रस्तावना :-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.५४१/२०२१ मधील संकीर्ण अर्ज क्र.१८०५/२०२१ मध्ये दिनांक ०४.१०.२०२१ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरून कोव्हीड-१९ या आजारामुळे मृत पावलेल्या व्यक्तींच्या जवळच्या नातेवाईकास रू.५०,०००/- इतके सानुग्रह सहाय्य प्रदान करण्याबाबत दिनांक २६.११.२०२१ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. महसूल व वन विभागा या योजनेच्या अंमलबजावणीसाठी ऑनलाईन वेबपोर्टल विकसित करण्यात येत आहे. मा.सर्वोच्च न्यायालयाच्या दिनांक ०४.१०.२०२१ रोजीच्या आदेशानुसार अर्ज केल्याच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत सानुग्रह सहाय्याची रककम अर्जदारास देणे अपेक्षित आहे. मात्र, या प्रकरणी दिनांक ०६.१२.२०२१ चे मा. सर्वोच्च न्यायालयाचे आदेश विचारात घेता प्राप्त झालेल्या अर्जांची छाननी करून मंजूर होणाऱ्या अर्जांपैकी किमान काही हजार अर्जदारांना सानुग्रह सहाय्याची रक्कम दि.०९.१२.२०२१ पूर्वी वितरीत करणे क्रमप्राप्त झाले आहे. त्यास अनुसरून या योजनेखालील अर्जदारास तातडीने सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याकरिता उपाययोजना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

कोव्हीड-१९ या आजारामुळे मृत पावलेल्या व्यक्तीच्या नजिकच्या नातेवाईकास सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याच्या योजनेसाठी विकसित करण्यात येणाऱ्या संगणकीय प्रणालीमध्ये जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाकडून अंतिमत: मंजूर होणाऱ्या अर्जांची जिल्हानिहाय माहिती उप सचिव (मदत) यांच्याकडे संगणकीय प्रणालीवर प्राप्त होणार असून त्याआधारे या योजनेखाली खर्च करण्याकरिता कार्यपध्दती खालीलप्रमाणे असेल:-

१) या योजनेखाली संगणकीय प्रणालीवर जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाकडून अंतिमत: मंजूर करण्यात आलेल्या लाभार्थ्यांच्या माहितीचे विवरणपत्र विचारात घेऊन आणि उपलब्ध तरतूद विचारात घेऊन ही रक्कम मंजूर करण्याबाबतचे ज्ञापन प्रधान सचिव (म. व पु.) यांच्या मान्यतेने या विभागाच्या म-३ कार्यासनामार्फत निर्गमित करण्यात येईल.

२) निर्गमित करण्यात आलेल्या ज्ञापनानुसार विभागाचे आहरण व संवितरण अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालयास देयक सादर करतील.

३) अधिदान व लेखा कार्यालयाने मंजूर केलेली रक्कम ईसीएसव्दारे या योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या खालील तपशीलाच्या बँकेमध्ये जमा करण्यात येईल.

| बँकेचे नाव | शाखा | खातेदाराचे नाव | खाते क्र. | IFSC Code |
|---|---|---|---|---|
| कोटक महिंद्रा | खेतान भवन, १९८, जमशेदजी टाटा रोड, मुंबई - ४००० २० | सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग | ९५४५४६२८५४ | KKBK०००००६४७ |

४) योजनेची अंमलबजावणी करणारी बँक पीएफएमएसव्दारे या रक्कमेचे वितरण संबंधित लाभार्थीस करेल. तथापि, पीएफएमएस इंटीग्रेशनमध्ये अडचणी आल्यास ही रक्कम आरटीजीएस/एनईएफटीव्दारे वितरीत करण्यात येईल.

५) काही तांत्रिक कारणामुळे (उदा.बँक खाते आधार संलंग्नीत नसणे, बँक खाते बंद असणे) बँकेस लाभार्थ्याच्या खात्यावर रक्क्म जमा करता न आल्यास ती कारणे दूर करण्याचा प्रयत्न करण्यात येईल आणि रककम संबंधित लाभार्थ्याच्या खात्यात जमा करण्यात येईल. तथापि, ही कारणे प्रयत्न करूनही दूर करता न आल्यास ही रक्कम बँक खात्यामधून काढून घेऊन शासनाच्या तिजोरीत भरण्यात येईल अथवा अन्य लाभार्थ्याकरिता समायोजित करण्यात येईल.

६) या योजनेखालील लाभार्थ्यांची संख्या मोठया प्रमाणात असल्याने आणि संगणकीय प्रणालीव्दारे आधार क्रमांकाची ओळख पटवून खात्यामध्ये रक्कम जमा होणार असल्याने देयकासोबत लाभार्थ्यांचा तपशील उपलब्ध करून दिला जाणार नाही. मात्र, प्रत्येक देयकाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांना वर्षाच्या अखेरीस सादर करण्यात येईल.

७) याबाबतचे देयके अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांना सादर करण्याकरिता, लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, आहरण व संवितरण अधिकारी आणि वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना नियंत्रक, अधिकारी, म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर निधीचे प्रदान करण्यापूर्वी खालील नमूद अटी व शर्तींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

अ) खर्चास तात्काळ आवश्यकता असल्याशिवाय कोषागारातून निधी आहरित करू नये.

ब) T +१ तत्वाचे काटेकोर पालन होईल हे पहावे.

क) या प्रयोजनासाठी देयक कोषागारात सादर करताना पूर्वीच्या देयकावर काढलेल्या निधीचे विनियोग प्रमाणपत्र (Utilisation Certificate) सादर करावे.

ड) वित्तीय औचित्याच्या सूत्राचे पालन व्हावे.

इ) SDRF निधीमधून होणाऱ्या विविध योजनांच्या प्रदानाचे वेगवेगळे लेखे ठेवावे.

२. या योजनेवरील होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय्य, १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) रोख भत्ता, मृत व्यक्तींच्या कुटूंबियांना सहाय्य जखमींना मदत (अनिवार्य), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ ०१५५) या लेखाशीर्षाखाली पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध होणाऱ्या निधीमधून भागविण्यात यावा.

३. हे शासन परिपत्रक, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ अनौपचारीक संदर्भ क्र. २३२/२१/ कोप्र-५, दि.८.१२.२०२१ व क्र. ४९०/२०२१/ व्यय-९, दि.८.१२.२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन परिपत्रक्र, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२११२०९१४३२२५३६१९ असा आहे. हे परिपत्रक्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2021.12.09 15:30:31 +05'30'

**(संजय औ. धारूरकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
२. आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. सर्व विभागीय आयुक्त,
४. सर्व जिल्हाधिकारी,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
७. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
८. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई,
९. मा.मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१०. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
११. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१२. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१३. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१४. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )